अर्थसंकल्पिय अनुदान २०१९-२०
संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता
अभियानांतर्गत निधी मंजूर/मुक्त
करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग
### शासन निर्णय क्रमांकः संगाग्रा-१४१६/प्र.क्र.४८२/पापु-१६

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकुल,
टिळक रोड, मंत्रालय, मुंबई-४०० ००१
तारीख: ०४ डिसेंबर, २०१९.

वाचा -

**शासन निर्णय क्रमांकः** संगाग्रा-२०१९/प्र.क्र.८७/पापु-१६, २३ जुलै, २०१९.

प्रस्तावना -

ग्रामीण स्वच्छता कार्यक्रमात ग्रामीण जनतेचा उत्स्फूर्त जनसहभाग वाढावा या दृष्टीकोनातून राज्यातील ग्रामीण भागात संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियान राबविण्यात येत असून उपरोक्त वाचा येथील शासन निर्णयान्वये या अभियानाबाबत सुधारित आदेश निर्गमीत करण्यात आला आहे. या अभियानांतर्गत राष्ट्रसंत तुकडोजी महाराज स्वच्छ ग्राम स्पर्धेतर्गत प्रत्येक ग्रामपंचायतीतील उत्कृष्ट प्रभागाला व जिल्हा परिषद गटस्तर, जिल्हापरिषद स्तर, विभागीय आणि राज्यस्तरावर पात्र ग्रामपंचायतींना पुरस्कार देण्यात येतात. विशेष पुरस्कारांतर्गत पात्र ग्रामपंचायतींना तसेच पात्र पंचायत समिती आणि पात्र जिल्हा परिषदांनाही पुरस्कार देण्यात येतात. संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियानाची अंमलबजावणी,प्रसिद्धी,तपासणी,दौरे व बक्षीस योजना इत्यादी करीता सन २०१९-२० साठी (लेखाशीर्ष २२१५ १९८८खाली) रु. ५४६५.००लक्ष इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आलेला आहे. अर्थसंकल्पीत निधीपैकी (६०%) रु. ३२७९.०० लक्ष निधी बिम्स प्रणालीवर वितरणासाठी उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे. सदर निधी वितरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय -

संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियानाची अंमलबजावणी,प्रसिद्धी,तपासणी,दौरे व बक्षीस योजना इत्यादी करीता सन २०१९-२० साठी (लेखाशीर्ष २२१५ १९८८खाली) रु. ५४६५.००लक्ष इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आलेला आहे. अर्थसंकल्पीत निधीपैकी (६०%) रु. ३२७९.०० लक्ष निधी

बीम्स प्रणालीवर वितरणासाठी उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे. सदर निधीपैकी वाचा येथील शासन निर्णयातील परिच्छेद क्र. ५ मधील तक्तानुसार उकृष्ट प्रभागाकरिता देण्यात येणारा पुरस्कार रू. १०,०००/- व "उत्कृष्ट प्रभाग" पुरस्कार वितरण सोहळ्याकरिता प्रति ग्रामपंचायत रू.१,०००/- याप्रमाणे राज्यातील २७,८६२ ग्रामपंचायतींसाठी अनुक्रमे रू २७८६.२० लक्ष व रू. २७८.६२ लक्ष असा एकूण रू. ३०६४.८२ लक्ष (रूपये तीस कोटी, चौसष्ट लक्ष, ब्याऐंशी हजार फक्त) इतका निधी संबंधित जिल्हा परिषदांना सोबत जोडलेल्या पत्रामधील तक्त्यातील स्तंभ क्र. ६ नुसार वितरीत करण्यास व उर्वरीत रू.२१४.१८ लक्ष (रू.३२७९.००लक्ष - रू. ३०६४.८२) लक्ष इतका निधी संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर यांच्या अधिनस्त ठेवण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

०२. "संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांचे अधिनस्त ठेवण्यात आलेली रूपये २१४.१८ लक्ष (रूपये दोन कोटी, चौदा लक्ष, अठरा हजार फक्त) एवढी रक्कम आहरण व संवितरण अधिकारी तथा वित्त नियंत्रक, रिफॉर्म सपोर्ट व प्रोजेक्ट मॅनेजमेंट युनिट (जलस्वराज्य प्रकल्प टप्पा-२), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचेकडे BEAMS प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. सदर रक्कम रूपये २१४.१८ लक्ष (रूपये दोन कोटी, चौदा लक्ष, अठरा हजार फक्त) अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई यांच्या कार्यालयातून आहरीत करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी तथा वित्त नियंत्रक, रिफॉर्म सपोर्ट व प्रोजेक्ट मॅनेजमेंट युनिट (जलस्वराज्य प्रकल्प टप्पा-२) (श्रीम.सुनिता केसकर), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना व नियंत्रक अधिकारी म्हणून उप सचिव तथा प्रकल्प संचालक, सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष (श्री. अभय महाजन), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय,मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर रक्कम रूपये २१४.१८ लक्ष (रूपये दोन कोटी, चौदा लक्ष, अठरा हजार फक्त) इतकी आहरण व संवितरण अधिकारी तथा वित्त नियंत्रक, रिफॉर्म सपोर्ट व प्रोजेक्ट मॅनेजमेंट युनिट (जलस्वराज्य प्रकल्प टप्पा-२), (श्रीम. सुनिता केसकर ),पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी अधिदान व लेखाधिकारी, मुंबई यांच्या कार्यालयातून आहरीत करून स्वतंत्र धनादेशान्वये संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, नवी मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे."

०३. या शासन निर्णयाद्वारे मुक्त केलेली रक्कम पुढील अटींवर मंजूर करण्यात येत आहे.

अ) या निधीत करण्यात येणारा खर्च जिल्हा परिषदेच्या लेख्यात अनुदान म्हणून वरील लेखाशीर्षात वेगळा ठेवण्यात यावा.

आ) या शासन निर्णयाद्वारे मंजूर केलेले निधी ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच कारणासाठी खर्च करण्यात यावा.

इ) संबंधित जिल्हा परिषदेने/संस्थेने या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या निधीपेक्षा जास्त खर्च करू नये.

ई) अट क्र.३-अ आणि ३-आ यांची पुर्तता झाली आहे याची खात्री करण्यासाठी, महालेखापाल-१, मुंबई व महालेखापाल-२, नागपूर यांच्याकडे जिल्हा परिषदेच्या संबंधित अधिकारी/कर्मचारी यांनी लेखे तपासणीसाठी सर्व कागदपत्रे उपलब्ध करून द्यावीत.

उ) सदर रक्कम राज्य शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनेप्रमाणे/ आदेशाप्रमाणे खर्च करण्यात यावी.

ऊ) ग्रामीण स्वच्छता कार्यक्रमाचा विहित नमून्यातील मासिक प्रगती अहवाल प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत शासनास पाठविण्याची दक्षता घ्यावी. शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनेप्रमाणे जिल्हा परिषदांनी या अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहित कालावधीत या विभागातील पापु-०४, पापु-१६ व पापु-२० या कार्यासनांस सादर करावा.

ऋ) सदर रक्कम खर्च करताना वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०१९/प्र.क्र.४४/ अर्थ-३, दिनांक ०१ एप्रिल,२०१९ व क्र.अर्थसं २०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३,दिनांक ०८ जुलै, २०१९ मधील अटी व शर्तींचे काटेकोरपणे पालन करून आवश्यक बाबींची पुर्तता करून कार्यपूर्ती अहवाल/नमूद प्रमाणपत्रे शासनास त्वरीत सादर करावीत.

ऌ) सदर रक्कम खर्च झाल्यानंतर त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास त्वरित सादर करावे.

०४. हा खर्च "मागणी क्रमांक वाय-०२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०२ जलनि:स्सारण व स्वच्छता, १०७ मलप्रणाल सेवा-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजना, (०४) संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियानाची अंमलबजावणी, (०४) (०५) संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियानाची अंमलबजावणी, प्रसिद्धी,तपासणी,दौरे व बक्षीस योजना ( २२१५ १९८८), २६ जाहिरात व प्रसिद्धी " या लेखाशीर्षाखाली घालावा. सदर अनुदान सशर्त मंजूर करण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०१९/प्र.क्र.४४/ अर्थ-३, दिनांक ०१ एप्रिल,२०१९ व क्र.अर्थसं २०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३,दिनांक ०८ जुलै, २०१९ अन्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच सदर परिपत्रकातील अटी व शर्तींच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.०१ एप्रिल,२०१९

च्या परिपत्रकातील अटी व शर्तींची तसेच परिशिष्टातील अ.क्र.९ मधील तपासणीसुचीतील अ.क्र.१ ते १० मधील लागू असलेल्या अटी व शर्तींची पुर्तता होत असल्याचे प्रमाणीत करण्यात येत आहे.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१२०३१३०८०७१९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Smita
Sachin Rane

Digitally signed by Smita Sachin Rane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f85d92aa99ea42eb86747707e3c3a129af986c1f95f6bc3e8165ceaf5155e6e7, serialNumber=4b9befd340493837db4cffafa6b96eeaf6aa3c12a7a6bf0467b0f517b724e8ee, cn=Smita Sachin Rane
Date: 2019.12.04 11:53:29 +05'30'

**(स्मिता स. राणे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत**

१. मा.मंत्री(पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खासगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री(पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खासगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. विभागीय आयुक्त, सर्व.
५. महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ मुंबई/नागपूर (लेखा परीक्षा व अनुज्ञेयता).
६. उप सचिव तथा प्रकल्प संचालक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. उपायुक्त, विकास/आस्थापना, सर्व विभागीय आयुक्त यांचे कार्यालय.
८. जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती सर्व.
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
१०. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
११. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/नागपूर.
१२.संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, (WSSO), बेलापूर, नवी मुंबई.
१३. उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पा. व स्व.), जिल्हा परिषद, सर्व.
१४.जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
१५.मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.

१६. कार्यासन क्र.पापु-०४, पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. निवड नस्ती, कार्यासन पापु-१६, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई

## संत गाडगेबाबा अभियानांतर्गत सन २०१९-२० करिता जिल्हा परिषदांना वितरीत करावयाचे अनुदान ( लेखाशीर्ष २२१५ १९८८)

**शासन निर्णय क्रमांकः संगाग्रा-१४१६/प्र.क्र.४८१/पापु-१६, दिनांक ०४ नोव्हेंबर, २०१९ सोबतचे पत्र**

| अ.क्र. | जिल्हा | जिल्हानिहाय ग्रामपंचायत संख्या | उत्कृष्ट प्रभागास देण्यात येणारी बक्षिस रक्कम प्रति ग्रामपंचायत रू. १०,०००/- | उत्कृष्ट प्रभाग" पुरस्कार वितरण सोहळ्याकरिता प्रति ग्रामपंचायत रू.१०००/- | एकूण रक्कम (रूपये) |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | अहमदनगर | **१३१२** | १३१२०००० | १३१२००० | **१४४३२०००** |
| २ | अकोला | **५३५** | ५३५०००० | ५३५००० | **५८८५०००** |
| ३ | अमरावती | **८४०** | ८४००००० | ८४०००० | **९२४००००** |
| ४ | औरंगाबाद | **८६४** | ८६४०००० | ८६४००० | **९५०४०००** |
| ५ | बीड | **१०३१** | १०३१०००० | १०३१००० | **११३४१०००** |
| ६ | भंडारा | **५४१** | ५४१०००० | ५४१००० | **५९५१०००** |
| ७ | बुलढाणा | **८७०** | ८७००००० | ८७०००० | **९५७००००** |
| ८ | चंद्रपूर | **८२७** | ८२७०००० | ८२७००० | **९०९७०००** |
| ९ | धुळे | **५४१** | ५४१०००० | ५४१००० | **५९५१०००** |
| १० | गडचिरोली | **४५५** | ४५५०००० | ४५५००० | **५००५०००** |
| ११ | गोंदिया | **५४५** | ५४५०००० | ५४५००० | **५९९५०००** |
| १२ | हिंगोली | **५६३** | ५६३०००० | ५६३००० | **६१९३०००** |
| १३ | जळगाव | **११४९** | ११४९०००० | ११४९००० | **१२६३९०००** |
| १४ | जालना | **७७९** | ७७९०००० | ७७९००० | **८५६९०००** |
| १५ | कोल्हापूर | **१०२६** | १०२६०००० | १०२६००० | **११२८६०००** |
| १६ | लातुर | **७८५** | ७८५०००० | ७८५००० | **८६३५०००** |
| १७ | नागपूर | **७६८** | ७६८०००० | ७६८००० | **८४४८०००** |
| १८ | नांदेड | **१३०९** | १३०९०००० | १३०९००० | **१४३९९०००** |
| १९ | नंदुरबार | **५९५** | ५९५०००० | ५९५००० | **६५४५०००** |
| २० | नाशिक | **१३८२** | १३८२०००० | १३८२००० | **१५२०२०००** |
| २१ | उस्मानाबाद | **६२१** | ६२१०००० | ६२१००० | **६८३१०००** |
| २२ | पालघर | **४७३** | ४७३०००० | ४७३००० | **५२०३०००** |
| २३ | परभणी | **७०३** | ७०३०००० | ७०३००० | **७७३३०००** |

| अ.क्र. | जिल्हा | जिल्हानिहाय ग्रामपंचायत संख्या | उत्कृष्ट प्रभागास देण्यात येणारी बक्षिस रक्कम प्रति ग्रामपंचायत रू. १०,०००/- | उत्कृष्ट प्रभाग" पुरस्कार वितरण सोहळ्याकरिता प्रति ग्रामपंचायत रू.१०००/- | एकूण रक्कम (रूपये) |
|---|---|---|---|---|---|
| २४ | पुणे | १४०१ | १४०१०००० | १४०१००० | १५४११००० |
| २५ | रायगड | ८०७ | ८०७०००० | ८०७००० | ८८७७००० |
| २६ | रत्नागिरी | ८४६ | ८४६०००० | ८४६००० | ९३०६००० |
| २७ | सांगली | ६९९ | ६९९०००० | ६९९००० | ७६८९००० |
| २८ | सातारा | १४९६ | १४९६०००० | १४९६००० | १६४५६००० |
| २९ | सिंधुदुर्ग | ४३१ | ४३१०००० | ४३१००० | ४७४१००० |
| ३० | सोलापूर | १०२९ | १०२९०००० | १०२९००० | ११३१९००० |
| ३१ | ठाणे | ४३० | ४३००००० | ४३०००० | ४७३०००० |
| ३२ | वर्धा | ५२० | ५२००००० | ५२०००० | ५७२०००० |
| ३३ | वाशिम | ४९१ | ४९१०००० | ४९१००० | ५४०१००० |
| ३४ | यवतमाळ | ११९८ | ११९८०००० | ११९८००० | १३१७८००० |
| एकूण | | २७८६२ | २७,८६,२०,००० | २,७८,६२,००० | ३०,६४,८२,००० |

Smita Sachin Rane

Digitally signed by Smita Sachin Rane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f85d92aa99ea42eb86747707e3c3a129af986c1f95f6bc3e8165ceaf5155e6e7, serialNumber=4b9befd340493837db4cffafa6b96eeaf6aa3c12a7a6bf0467b0f517b724e8ee, cn=Smita Sachin Rane
Date: 2019.12.04 11:54:17 +05'30'

(स्मिता स. राणे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन